प्रकल्प अंमलबजावणी समितीची (Project Implementation Committee) स्थापना करण्याबाबत.

**मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांच्या कार्यालयात दोन अतिरिक्त तांत्रिक अधिकाऱ्यांच्या सेवा उपलब्ध करुन घेणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सामान्य प्रशासन विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : ईएसटी-२०२३/प्र.क्र.५१६/२३/३३,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई – ४०० ०३२.

दिनांक : २१ जुलै, २०२३

**प्रस्तावना :-**

भारत निवडणूक आयोगाकडून निवडणूक विषयक कामासाठी ERO-Net, BLO-Net या सुधारीत प्रणाली वापरात आहेत. या प्रणालीमार्फत मतदार नोंदणी प्रक्रियेचे संगणीकरकरण करण्यात येते. तसेच NVSP या आज्ञावलीमार्फत मतदार याद्यांच्या डाटाची तपासणी करणे, गणना करणे, त्रुटी तपासणी व राज्यातील मतदार नोंदणीच्या अनुषंगाने विविध अहवाल तयार करणे अशी निवडणूक विषयक महत्वाची कामे करण्यात येतात. यासाठी मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांच्या कार्यालयात सदर निवडणूक विषयक डेटाबेस ॲप्लीकेशन व वेबसाईट (CEO Website) अद्ययावत ठेवण्यासाठी सद्य:स्थितीत राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र (NIC) यांनी National Informatics Centre Services Inc. (NICSI) यांच्याकडून उपलब्ध करुन दिलेले ३ तांत्रिक अधिकारी (Two Project Manager Tier-II व One Programme Manger Tier-II) कार्यरत आहेत.

३. आगामी लोकसभा सार्वत्रिक निवडणुका-२०२४ च्या अनुषंगाने भारत निवडणूक आयोगाच्या निर्देशानुसार विविध तांत्रिक कामे/ सॉफ्टवेअर जसे ETPBS, EMS इत्यादी ॲप्सवरील कामेसुध्दा करावयाची आहेत. तसेच मतदार याद्या पुनरिक्षण कार्यक्रम आता वर्षातून चार वेळेस होणार आहे. या अनुषंगाने तांत्रिक कामांवर मोठया प्रमाणावर वाढ झाली असून सद्य:स्थितीत या कार्यालयात कार्यरत ३ तांत्रिक अधिकाऱ्यांकडून सदर कामे करणे जिकरीचे होत आहे. यास्तव, सदर वाढीव तांत्रिक कामे विहित वेळेत पूर्ण करण्यासाठी सद्य:स्थितीत कार्यरत ३ तांत्रिक अधिकाऱ्यां व्यतिरिक्त अतिरिक्त २ तांत्रिक अधिकाऱ्यांच्या सेवा उपलब्ध करुन घेणे आवश्यक आहे. त्या अनुषंगाने मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांच्या कार्यालयातील निवडणूक विषयक तांत्रिक कामे विहित वेळेत पूर्ण करण्यासाठी अतिरिक्त २ तांत्रिक अधिकाऱ्यांच्या सेवा उपलब्ध करुन घेण्याबाबत निर्णय घेण्यासाठी प्रकल्प अंमलबजावणी समिती स्थापन करण्याची बाब विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांच्या कार्यालयातील निवडणूक विषयक तांत्रिक कामे विहित वेळेत पूर्ण करण्यासाठी अतिरिक्त २ तांत्रिक अधिकाऱ्यांच्या सेवा उपलब्ध करुन घेण्याबाबत निर्णय घेण्यासाठी पुढीलप्रमाणे प्रकल्प अंमलबजावणी समितीची स्थापना करण्यात येत आहे :-

| | |
|---|---|
| अपर मुख्य सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य | अध्यक्ष |
| सचिव/प्रधान सचिव/अ.मु.स., नियोजन विभाग किंवा त्यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| सचिव/प्रधान सचिव/अ.मु.स., वित्त विभाग किंवा त्यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| सचिव/प्रधान सचिव/अ.मु.स., उद्योग विभाग किंवा त्यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| संचालक, माहिती तंत्रज्ञान यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| उप सचिव व सह मुख्य निवडणूक अधिकारी | सदस्य |

२. सदर समितीने मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांच्या कार्यालयातील तांत्रिक कामे विहित वेळेत यशस्वीरित्या पार पाडण्याच्या दृष्टीने अतिरिक्त २ तांत्रिक अधिकाऱ्यांच्या सेवा उपलब्ध करुन घेण्याबाबत सदर समितीने निर्णय घ्यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७२११५०३१३७९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by MANOHAR RAMCHANDRA PARKAR
Date: 2023.07.21 15:07:55 +05'30'

**( म. रा. पारकर )**
**उप सचिव व सह मुख्य निवडणूक अधिकारी,**
**महाराष्ट्र राज्य**

**प्रत,**

१. सचिव/प्रधान सचिव/अ.मु.स., नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
२. सचिव/प्रधान सचिव/अ.मु.स., वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सचिव/प्रधान सचिव/अ.मु.स., उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
४. संचालक, माहिती तंत्रज्ञान, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी यांचे स्वीय सहायक
६. उप सचिव व सह मुख्य निवडणूक अधिकारी, यांचे स्वीय सहायक
७. निवड नस्ती (कार्या.३३)